सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने “मागणी क्र. एल-३-२४१५ कृषिविषयक संशोधन शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यशदा, पुणे” यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप.

मुख्य लेखाशीर्ष-२४१५०५१७ (दुसरा हप्ता- वेतनेतर)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ५१/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा** - १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४. दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५
२. शा. नि. ग्रा.वि.वि., क्र.अनुग्रा-२०२४/ प्र.क्र.५१/आस्था-१५, दि.१३.०९.२०२४.
३. वित्तीय सल्लागार, यशदा, पुणे यांचे दि.०३.०२.२०२४ व दि.१८.०३.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना :**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा), पुणे यांना ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) लेखाशिर्ष २४१५ ०५१७ या लेखाशिर्षाखाली रु.१,४०,००,०००/- (रुपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त) इतकी तरतूद सुधारित अंदाजानुसार अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता वाचा येथील क्र.२ च्या शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा), पुणे यांना ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता **रु. १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त)** इतके अनुदान पहिला हप्ता म्हणून वितरीत करण्यात आलेले आहे. यशदा, पुणे यांनी त्यांच्या वाचा येथील क्र.३ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी दुसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरीता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर मर्यादेच्या अधिन राहून यशदा, पुणे यांना ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता रु.४०,००,०००/- (रुपये चाळीस लक्ष फक्त) इतके अनुदान दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्र. एल-३-२४१५ कृषिविषयक संशोधन शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यशदा, पुणे, मुख्य लेखाशीर्ष - २४१५ ०५१७ या लेखाशिर्षाखाली ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

३. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहील. :-

१) यशदा, पुणे यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.
२) यशदा, पुणे यांनी सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर केले आहे, त्यासाठीच खर्च करावे.
३) यशदा, पुणे यांना दरमहा जितके अनुदान आवश्यक असेल तितकेच अनुदान कोषागारातून दरमहा काढण्यात यावे.
४) या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.
५) याद्वारे मंजूर रकमेचे देयक करताना देयकावर संबंधीत सांकेतांक न चुकता नमुद करावा.

५. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन तसेच वित्त विभागाकडील अनौ.सं.क्र.२१४/व्यय-१५, दि.२५.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२८१३१२१५५५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

KAUSTUBH SUDHAKAR RANE

Digitally signed by KAUSTUBH SUDHAKAR RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=78b99ab06beb869e5c389d21dd25d4a1a60d87c91cb0bb868021d70abc925c3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAAAFEFABBD1DFDAD691286AA9D035C7536D65527975D97124960BB882959CDB, cn=KAUSTUBH SUDHAKAR RANE
Date: 2025.03.28 18:04:48 +05'30'

(कौस्तुभ राणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (२ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-७, ग्राम विकास विभाग.
१०. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.